“गोवारी” समाज बांधवाच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम - विशेष मागास प्रवर्गातील “गोवारी” समाजातील बेरोजगार युवक / युवतींना स्पर्धा परीक्षेसाठी शुल्कात आर्थिक सवलती लागू करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२४/प्र.क्र.०९(५)/योजना-३**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, विस्तार इमारत, मुंबई-३२.
दिनांक: २० मे, २०२५.

**संदर्भ :-** इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दिनांक १५.१०.२०२४

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभागामार्फत अनूसूचित जमातींसाठी सुरु असलेल्या योजनांच्या धर्तीवर विशेष मागास प्रवर्गातील “गोवारी” समाज बांधवाच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम वित्त विभागाच्या सहमतीच्या अधीन राहून राबविण्यास या विभागाच्या संदर्भाधिन दिनांक १५.१०.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने, सदरहू विशेष कार्यक्रमांतर्गत “गोवारी” समाजाच्या विद्यार्थ्यांना स्पर्धा परीक्षांमध्ये बसण्यासाठी परीक्षा शुल्कात आर्थिक सवलत देण्याबाबत या योजनेच्या अंमलबजावणीसाठी विहित कार्यपद्धती, योजनेच्या लाभार्थ्यांसाठी पात्रतेचे निकष व अटी विहित करण्यासाठी मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक २९.०४.२०२५ रोजीच्या बैठकीत निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुषंगाने सदर योजना राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक २९/०४/२०२५ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार, विशेष मागास प्रवर्गातील “गोवारी” या समाजातील युवक / युवती यांनी पदवी अभ्यासक्रम किमान ६० टक्के गुणासह उत्तीर्ण केलेल्या बेरोजगार विदयार्थ्यांना महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या (MPSC) स्पर्धा परीक्षेत बसण्यासाठी परीक्षा शुल्कात आर्थिक सवलत देण्यात येत असून महात्मा ज्योतीबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती) या संस्थेच्या माध्यमातून ही योजना राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू योजनेसाठी रुपये २५ लक्ष (रुपये पंचवीस लक्ष फक्त) इतका निधी मंजूर करण्यात येत असून सदरहू निधी महात्मा ज्योतीबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती) या संस्थेस उपलब्ध करुन देण्यात यावा. महात्मा ज्योतीबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती) या संस्थेने सदरहू प्रशिक्षण योजना शासनाच्या मान्यतेने राबवावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा. महात्मा ज्योतीबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती) या संस्थेने यासाठी योजना राबविण्यापूर्वी योजनेचे विविध घटक / अर्थसंकल्प यांची या विभागाकडून वेगळी मान्यता घ्यावी.

३. या योजनेकरीता नवीन लेखाशिर्ष घेण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. सं. क्र. ०५/२०२५, दिनांक ११/०४/२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून याचा संगणक सांकेतक क्रमांक २०२५०५२०१७३३०८०९३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by RAVINDRA RAMDAS PETKAR
Date: 2025.05.20 17:34:00 +05'30'

**(र. रा. पेटकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. सभापती, विधान परिषद यांचे खाजगी सचिव.
३. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव.
४. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.उपमुख्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव.
८. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
९. मा.विरोधी पक्षनेते, विधान परिषद / विधानसभा यांचे खाजगी सचिव.
१०. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव / उप सचिव.
११. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. जिल्हाधिकारी (सर्व).
१७. व्यवस्थापकीय संचालक, महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती), नागपूर.
१८. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१९. सर्व प्रादेशिक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग.
२०. सर्व सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण.
२१. महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर.
२२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२३. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प / संस्था), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४. निवडनस्ती (योजना-३).